# इतिहास

**-- चं.प्र.देशपांडे.**

( सरकार, प्रती आणि बाकी. कृतीत सहभागी नसताना बाकी प्रेतपुतळा-निश्चल-मधेच कुठेतरी उभा.)

प्रतीः नेहमीप्रमाणेच आजही तुझं भाषण छान झालं.

सरकारः ' नेहमीप्रमाणेच' ? हा शब्द वापरायचा उद्देश ?

प्रतीः तुझ्या या प्रश्नानं नेहमीचीच शंका पुन्हा माझ्या मनात आलीय.( सरकार ' कोणती'? ' या अर्थी पाहतो.) तू माझ्याशी एक मित्र आणि सहकारी या दृष्टीनं बऱ्याच वेळा वागू शकतोस, हे खरं की खोटं ? माझं विरोधकाचं नातं तुझ्या मनात नेहमीच पायाभूत असतं की काय ? माझा असा एखादा शब्द तुला उगीचच खटकतो कसा ?

सरकारः म्हणजे ' नेहमीप्रमाणेच ' हा शब्द वापरण्यामागे तुझा काहीच उद्देश नव्हता तर ?

प्रतीः असेलही - नकळत -- आणि असलाच तर माझ्याही मनात मी तुला एक फक्त विरोधक म्हणूनच धरलेलं आहे, असं म्हणावं लागेल.

सरकारः ही जर शक्यता गृहीतच धरावी लागणार आहे, तर मग एखाद्या आरोपीप्रमाणे तू मला तो प्रश्न विचारायची काहीच गरज नव्हती.

प्रतीः नसेल. पण आपल्या नात्यातली अनिश्चितता कायम ठेवायचा खेळ आपल्याला दोघांनाही खेळायचा आहे. त्यासाठी थोडंफार अज्ञान स्वीकारणं आपल्याला दोघांनाही भाग आहे.( सरकार सुस्कारतो.) तर खरंच -- तुझं आजचंही भाषण छान झालं -- नेहमीप्रमाणेच !

सरकारः माझी भाषणं चांगली होतात याचं कारण आदर्श सत्यात उतरल्यानंतरचं मानवी आयुष्याचं चित्र मी स्पष्टपणे पाहू शकतो -- आत्ताच. आणि लोकांना न विस्कटता तिथपर्यंत पोचायचा मार्ग माझ्याजवळ आहे. ( काही क्षणांनी --) प्रती, मी खरंच तुला मित्र मानतो. म्हणूनच माझी अस्वस्थताही तुला दिसू देण्यात मला संकोच वाटत नाही.

प्रतीः आत्ता तू अस्वस्थ असलास तर मग तू ते आत्ता सांगेपर्यंत माझ्या लक्षात आलेलं नव्हतं. पण आता खरोखरच तू अस्वस्थ दिसतोयस खरा.

सरकारः होय प्रती, मी अस्वस्थ आहे.

प्रतीः सरकार ! एवढा मोठा माणूस ! ! अस्वस्थ ! ! !

सरकारः मी सरकार. खरं आहे. पण या सगळ्या मोठेपणातूनही माझा असा एक भाग उरतो. आणि तो फारच लहान असतो. आणि तो मला कुरतडतो. विशेषतः भाषणाच्या वेळी.

प्रतीः सुखदायक स्वप्नाकडे पोचायचा मार्ग आखताना ?

सरकारः होय. सुखदायक स्वप्नाकडे पोचायचा मार्ग आखताना...तुला माहिती आहे प्रती, मी जेवतो उजव्या हातानं, लिहितो उजव्या हातानं -- पण--पण--भाषण करताना -- बोलताना--नकळतच --माझा उजवा हात अचेतन होतो. हलतच नाही. आणि माझ्या बोलण्याला पूरक सगळ्या हालचाली माझा फक्त डावा हातच करतो. ते अगदीच बेंगरूळ दिसत असेल याची मला कल्पना आहे. काही वेळा तर एकटा असताना मी खोटी खोटी भाषणं करून हा बेंगरूळपणा घालवायचाही प्रयत्न करतो. उजव्या हातातही चैतन्य आणून बोलायच्या तालमी करतो. पण प्रत्यक्ष भाषणात पुन्हा तेच घडतं. मला भीती वाटते. हातांची काळजी घेण्याच्या नादात भाषण घसरायची शक्यता आहे. आधी नीट सवय करायला हवी. प्रत्यक्ष भाषणाच्या वेळी धोका पत्करण्यात अर्थ नाही. आणि मग मी माझ्या या दोषाकडे डोळेझाक करून भाषण पूर्ण करतो. ते नुसतं स्वीकारून चालतो.

प्रतीः तू लहानपणी डावखुरा होतास ?

सरकारः होय.

प्रतीः आणि तुला सक्तीनं उजवा केलं गेलं ?

सरकारः होय.

प्रतीः मग तेच कारण आहे.

सरकारः असेल. पण नुसतं कारण कळून काय उपयोग आहे ? बहुतेक सगळ्याच गोष्टींची कारणमीमांसा लावता येतेच आपल्याला -- आपापल्या परीनं.

प्रतीः म्हणजे वाईट गोष्टींच्या कारणांचा नायनाट करण्यावरही तुझा धड विश्वास नाही.

सरकारः प्रती, कारणं माणसांमधे असतात-- आणि माणसांना हानी न पोचता सगळं साधायचा हा प्रयत्न आहे.

प्रतीः (पाठांतर केल्याप्रमाणे ) म्हणूनच आपल्या देशात उसाला बाजरी म्हणतात. उसाच्या पिकावर कर जास्त आहे म्हणून तलाठ्यांकडून कागदावर उसाची बाजरी करून घेतली जाते. अणि आपले पिकांचे सगळे आकडे खोटे येतात. या खोट्या आकड्यांवर बांधलेले आपले अंदाज कोसळतात आणि जनतेला पुन्हा पुन्हा निराश व्हावे लागते. तलाठ्यांना आणि जमीनदारांना दुःख न देता ही निराशा घालवण्याचा आपण प्रयत्न करत राहतो. आणि आपल्या अशा प्रयत्नांना कधीच यश येणार नाही या स्पष्ट शक्यतेकडे दुर्लक्ष करून आपण लोकहितदक्ष म्हणून मिरवू शकतो.

सरकारः प्रती, हळूहळू सुधारणा करण्यावर आमचा विश्वास आहे.

प्रतीः हा फक्त मी इतकं जे काही म्हटलं त्याचा सारांश ! -- तुझ्या हातांचा असमतोल तुला अस्वस्थ करणार -- आणि ही वैयक्तिक अस्वस्थता घेऊन तू इतरांचं भलं करणार !

सरकारः ( करडेपणाने ) प्रती, एक अधिकारी या नात्यानं तू माझ्या आज्ञा पाळलेल्या नाहीस. रस्त्यातला दगड बाजूला काढून घ्यायला मी तुला सांगितलं होतं. लोकांच्या जाण्यायेण्याच्या मार्गावर पालापाचोळा पडतो आहे, तोही वेळच्या वेळी काढून घ्यायला मी तुला सांगितलं होतं.

प्रतीः यस सर ! सॉरी सर ! ( हाक मारत ) बाकी, ए बाकी !

( बाकी हलतो. हळूहळू पुढे येतो.)

तू दगड बाजूला केला नाहीस ? पालापाचोळा काढला नाहीस ?

( बाकी मान खाली घालून उभा.)

नुसता उभा राहू नकोस. बी क्विक ! ( बाकी सावकाशपणे कामाला लागतो. दगड ढकलून जोर लावून बाजूला करतो. पालापाचोळा उचलून एकीकडे टाकत राहतो.)

सरकारः रस्ता स्वच्छ पाहिजे. लोकांना मुक्तपणे जाता येता आलं पाहिजे. लोकांच्या पायांना ठेचा लागता कामा नयेत. लोकांच्या पायांखाली कचरा नसलेला स्वच्छ रस्ता पाहिजे. थकणार नाही इतपतच चालल्यावर लोकांना थांबायचं स्वातंत्र्य पाहिजे. ( बाकी थांबतो.)

प्रतीः बाकी, थांबलास का ? काम झालं ? बाकी, तुझ्या डोळ्यांत पाणी ? ओहोहोहोहो -- तुझं दुःख ! इकडे ये. तुझं दुःख मला सरकारपर्यंत पोचवायलाच हवं.

( तो बाकीला सरकारसमोर उभा करतो.)

हा बाकी. हा दुःखी आहे. याच्या बायकोला एक अलंकार हवा होता. पण हा, तो अलंकार तिला देऊ शकला नाही आणि देऊ शकणारही नाही. घरच्या गरजा आणि दारू यांनाच पैसा अपुरा पडतो, तर हा तरी काय करणार ? दुसरा कुणी, जो, तो अलंकार तिला देऊ शकत होता, त्याच्याकडून तो स्वीकारायची तिची इच्छा होती आणि त्याच्या बदल्यात त्या दुसऱ्याखाली झोपायचीही तिची तयारी होती. परंतू याची बायको असेपर्यंत उघडपणे काहीच करता येत नव्हतं. म्हणून ती दुःखी होती आणि ते दुःख निवारण्यासाठी चोरट्या संबंधांचं सुख चाखत होती. हळूहळू लोकांना हे कळत गेलं आणि यालाही ते कळून चुकलं -- आणि याला कळलेलं तिलाही कळून चुकलं. ती खूप रडली. पश्चात्ताप झाला म्हणाली. पण याचा अपमान झाला तो झाला. कोणतीच आततायी किंवा टोकाची कृती करू न शकणारा हा माणूस, हा दुःखी आहे. अपमानाच्या ओझ्याखाली पिचतो आहे. हा माणूस रस्त्यावरचे दगड काढणार, पाचोळा काढणार -- पण रस्त्यावरून चालताना पायांखाली स्वच्छ मोकळा रस्ता असला तरी पायांवर अपमानित देह आहे त्याचं काय ? त्याचं काय ?

सरकारः मला वाटतं, प्रथम आपण लोकांची मनोभूमिका तयार करावी आणि मग अलंकारांना बंदी करावी.

प्रतीः म्हणजे असुंदर बायकांना त्यांच्यातली सौंदर्याची कमतरता भरून काढायची आणि सुंदर बायकांना अधिक सुंदर दिसायचा प्रयत्न करायची तुम्ही संधी ठेवणार नाही ? यातून केवढ्या प्रचंड दुःखाची निर्मिती होईल याची आपल्याला कल्पना आहे ?

सरकारः मग प्रथम दुसरीच एक मनोभूमिका तयार करून नंतर बायकांना, नवऱ्यांखेरीज दुसऱ्यांकडून कसलीही अपेक्षा करायची बंदी केली तर ?

प्रतीः स्वतः नवऱ्यालाही नकळत ज्या गोष्टी चालू शकतात त्या सरकार थांबवू शकणार आहे काय ?

सरकारः मग त्यापेक्षा दुसरीच एक मोकळी मनोभूमिका तयार करून नवरा-बायको या संबंधाची बंधनंच काढून टाकावी --हाच एक मार्ग दिसतो. म्हणजे कुणीही अपमानित होण्याचा प्रश्न येणार नाही.

प्रतीः आपण सांगता ते सगळेच उपाय थोडं थोडं तथ्य असलेले आहेत, पण प्रत्येकातून दुसरे अनेक प्रश्न निर्माण होणार आहेत. तेव्हा हे सर्व प्रकार बाजूला ठेवून -- आत्ता -- या क्षणी -- या गरीब बिचाऱ्या माणसाला त्याच्या दुःखातून मुक्त करावं, अशी आमची आपल्या चरणी प्रार्थना आहे. पाहा, तो कसा दुबळा होऊन उभा आहे. पाहा, त्याचे कपडेही कसे मळके आणि बापुडवाणे दिसताहेत. पाहा, त्याच्या कातडीचा काळा रंग कसा एखाद्या पराभवाप्रमाणे त्याच्या आयुष्यावर पसरला आहे. पाहा पाहा, त्याचे गढूळ डोळे आणि एकमेकात बोटं गुंतलेले त्याचे लुळे हात. आणि त्याची वाकलेली मान.

सरकारः ( किंचाळतो.) या माणसाला ताबडतोब माझ्या समोरून बाजूला न्या ! एका एका माणसाचं भलं करत बसलो तर शेकडो वर्षं अपुरी पडतील. एखाद्या माणसाला सुखी करणं म्हणजे काय चेष्टा समजता काय तुम्ही ? आपण फार फार तर सामाजिक दुःखाची तीव्रता कमी करू शकतो. प्रत्येक माणसाची चिरगुटं माझ्यापुढं आणून सोडायला तुम्हाला शरम नाही वाटत ?
( दरम्यान बाकी बाजूला जाऊन मूळ जागी प्रेतपुतळा. )

प्रतीः सॉरी सर -- सॉरी सर -- रिअली सॉरी सर !

सरकारः आणि त्याला नीट कल्पना द्या. म्हणावं, तुझ्या वैयक्तिक दुःखाचा तुझ्या कर्तव्यावर परिणाम होऊ दिलास तर तुला कामावरून काढून टाकावं लागेल ! याच्या बायकोला अलंकार हवा होता म्हणून इतर लोक दगडांवरून ठेचकाळत कचऱ्यातून चालणार काय ! इडियट !

प्रतीः मी जरूर सांगेन सरकार ! पण त्याचबरोबर मी एक गोष्ट आत्ताच स्पष्ट करू इच्छितो सरकार ! याच पध्दतीचे काही प्रश्न आज ना उद्या आपल्याला विचारण्यात येणार आहेत !

सरकारः कोणते प्रश्न ?

प्रतीः एखाद्या माणसाला संपत्ती जमवायची महत्त्वाकांक्षा आहे म्हणून इतरांनी दरिद्री राहावं काय ? पैसा असलेला माणूस पैसा पेरून खोटया गोष्टी करू शकतो आणि फसवणुकीच्या मार्गानं अधिक पैसा जमवू शकतो म्हणून काही निरपराध लोकांनी त्याच्याकडून फसवून घेतलं जावं काय ? उसाचे आकडे बाजरी म्हणून खपवून घ्यावे काय ? गरजेपोटी श्रीमंतांकडून नागवलं जावं काय ?

सरकारः प्रती, विरोधाचं स्वातंत्र्य वापरून तू माझ्या आज्ञा धाब्यावर बसवतो आहेस !

प्रतीः सॉरी सरकार ! बाकी, ए बाकी -- ( बाकी पुढे येतो.) रस्त्यावर किती पाचोळा साठला आहे पाहिलास का ? चल, झटपट सगळं साफ कर पाहू.( बाकी पाचोळा उचलू लागतो.)

सरकारः प्रती, थोड्या विचारांती तुझ्या म्हणण्यात बरंच तथ्य आहे असं वाटायला लागलंय मला. बऱ्याच बाबतीत आपल्याला नियंत्रणांचा अवलंब करावा लागेल असं वाटतं.

प्रतीः न केल्यास हाच बाकी एक दिवशी आपल्याला आणि जमीनदारांना पाचोळ्यात गाडून टाकील सरकार ! नम्र सूचनेबद्दल माफी असावी सरकार !

सरकारः ( हातांचा समतोल राखण्याचा हेतुपुरस्सर प्रयत्न करीत ) प्रती, माझी तुला विनंती आहे की, एक त्रयस्थ या नात्यानं माझी आत्ताची तालीम तू बघावीस आणि योग्य त्या सूचना कराव्यास.

प्रतीः जी सर !

सरकारः आपण व्यक्ती महत्त्वाच्या मानतो की समाज, या प्रश्नाचं उत्तर देण्याची वेळ आता आलेली आहे. आणि हे उत्तर देण्याची जबाबदारी टाळू म्हणता टळणारी नाही. निरनिराळ्या प्रकारे व्यक्तींचं समाजावर आक्रमण होत आहे आणि समाज त्यात होरपळून निघतो आहे. आजपर्यंत आपण व्यक्तिस्वातंत्र्य आणि समाजस्वातंत्र्य एकच मानत आलो, परंतु आता समाजस्वातंत्र्याला अग्रक्रम देण्याचा विचार आपल्याला करावा लागणार आहे. कुठलीही व्यक्ती समाजबाह्य आयुष्य कंठू शकत नाही. मग व्यक्तीचं आयुष्य धारण करणाऱ्या समाजाबद्दल बेफिकीर राहून कसं चालेल ? व्यक्तीच्या आयुष्याची एक गरज म्हणून आणि नैतिक जबाबदारी म्हणूनही आता यापुढच्या काळात सामाजिक सुखाचा प्रामुख्यानं विचार करावा लागणार आहे. साधेपणा आणि त्याग या मूल्यांना व्यक्तिजीवनात योग्य ते स्थान मिळाल्याशिवाय सामाजिक सुखाची कल्पनाही करणं अशक्य आहे. आणि ही मूल्यं व्यक्ती शहाणपणानं आणि स्वेच्छेनं स्वीकारत नाहीत असा प्रखर, दाहक अनुभव आपल्यासमोर आहे. अशा परिस्थितीत सक्तीनं या मूल्यांची

प्रस्थापना करणं हे समाजाचं हितचिंतक सरकार म्हणून आमचं आद्य कर्तव्य ठरतं.

प्रतीः (टाळ्या वाजवून) छान, छान !

सरकारः माझे विचार लोकांना पटवून सांगण्यात मी कधीच कमी पडणार नाही.

प्रतीः नाही, विचारांचा नाही, पण हातांचा समतोल छान साधला गेला. हे निश्चितपणे तुला जमू शकेल. बाकी, ए बाकी --

(बाकी येतो.)

सरकारः (बाकी समोर बसल्यावर हातांची जाणीव पुन्हा गडद होते आणि अस्वस्थता येते. त्यामुळे नंतर नुसता डावा हात हलवतच बोलतो.) काही व्यक्तींना अधिक सुख हवं आहे, अधिक शाश्वती हवी आहे आणि ती मिळवण्याची त्यांच्यांत क्षमता आहे -- या सामग्रीवर समाजावर अन्याय करण्याचे अधिकार त्यांना मिळू देता येणार नाहीत. आज याची आई आजारी आहे, तिला औषध हवं आहे, तिचं ऑपरेशन करणं आवश्यक आहे -- पण तो खर्च याला परवडणारा नाही, म्हणून याची आई तशीच तडफडून मरणार आहे. आपण म्हणू की हा त्याचा प्रश्न आहे, आणि हे तिचं नशीब आहे -- पण हे खरं आहे का ? की हा एक सामाजिक प्रश्न आहे ? माझ्या आईला औषध मिळणं महत्त्वाचं आहे आणि त्याच्या आईला औषध मिळणं तितकं महत्त्वाचं नाही असं आपण म्हटलं तर तो ढोंगीपणा आणि स्वार्थीपणा ठरणार नाही का ? आणि दुसऱ्यांच्या आयुष्यांना धोका निर्माण करणाऱ्या या स्वार्थीपणाची परिणती कशात होईल ?...

(पुढे जरा वेळ मूकभिनय -- डाव्या हाताच्या प्रचंड हालचाली. मग भाषण संपते. बाकी टाळ्या वाजवतो, खुषीत उठतो, मजेत लगबगीने निघून जातो. प्रेतपुतळा उभा.)

प्रतीः तू पुन्हा घसरलास. तुला डाव्या हातानं भाषण करताना पाहणं हा डोळ्यांना एक प्रचंड त्रास होता. अत्यंत कुरूप दृश्य होतं ते.

सरकारः असू दे. मला माहीत आहे. माझा उत्साहभंग करायचा प्रयत्न करू नकोस. वैयक्तिक दोषांसकटच आपल्याला आता हा जगन्नाथाचा रथ पुढे न्यायचा आहे. मी सांगतो त्या त्या ठिकाणी रस्त्यात धोंडे ठेवून घे.

प्रतीः घेतले सरकार.

सरकारः या आणि अशाच मार्गानं आता सर्वांना जावं लागेल. वैयक्तिक स्वार्थाच्या वेगाला आता अडथळ्यांनी अटकाव केला जाईल.

प्रतीः तीन संपत्तिधारकांनी आत्महत्या केल्या आहेत सरकार.

सरकारः ही त्यांच्या स्वार्थाची शेवटची कृती आहे.

प्रतीः काहीजण प्रचारकार्यात गुंतले असून विरोधी गट उभे करत आहेत.

सरकारः त्यांना पकडून तुरुंगात टाका. त्यांची मालमत्ता जप्त करा.

प्रतीः आपली राजवट जुलुमी आहे, असं काही वृत्तपत्रं म्हणत आहेत.

सरकारः त्यांचे छापखाने सील करून टाका.

प्रतीः आपल्या अशा उपायांनी आपण आपल्या राष्ट्राचा बौध्दिक ऱ्हास घडवून आणत आहात.

सरकारः असं म्हणणाऱ्या बुध्दिमंतांना नोकऱ्यांवरून काढून टाका.

प्रतीः आपण हुकूमशहा झाला आहात.

सरकारः सामाजिक हुकूमशाहीच्या हिंसात्मक शक्यतांतून मी राष्ट्र वाचवीत आहे.

प्रतीः आमच्याच देशात आम्ही परतंत्र झालो आहोत. आम्हाला स्वातंत्र्य हवं आहे.

सरकारः आता स्वार्थी स्वातंत्र्याचे दिवस संपलेले आहेत.

प्रतीः या देशात सत्याची प्रस्थापना करण्याची स्वप्नं आम्ही पाहत राहू.

सरकारः तुमच्या सत्याहून हे सत्य महान आहे.

(काही क्षण शांतता.)

प्रतीः (धीम्या स्वरात) आता जुने दिवस गेले आहेत.

(सनई.)

आणि नवं पर्व सुरू होत आहे. ही नवी पहाट आहे. हे नवं सरकार आहे. आम्ही नव्या सरकारचे सेवक आहोत...सरकार, आपण नवा इतिहास घडवत आहात -- आपण महान आहात !

सरकारः प्रती, हे तितकंस खरं नाही. मला तर असं वाटतं की इतिहास कुणी घडवत वगैरे नसतंच. तो

|  |  |
|---|---|
|  | आपल्यातच असतो. फक्त तो अटळपणे अवतरत जातो. काही व्यक्तींचा या क्रियेला उपयोग झालेला दिसतो इतकंच. |
| प्रतीः | वा, छान ! व्यक्तिमाहात्म्य नष्ट करण्याच्या आपल्या विचारसरणीशी सुसंगत असेच हे विचार आहेत. शिवाय काही व्यक्तींना अधिकार मिळणं आणि इतरांना ते न मिळणं याचंही समर्थन या विचारात मिळू शकतं. |
| सरकारः | पण म्हणूनच असं वाटतं प्रती, की पुन्हा आपण एका दैववादाशीच येऊन पोचतो का काय ! म्हणजे आपण जिथून निघालो तिथेच अजून आहोत की काय ? |
| प्रतीः | हा दैववाद असलाच तर तो माणसाचा शहाणपणा आणि माणसाची कृती यांच्यावर आधारलेला आहे -- हतबलपणा आणि पराभूत वृत्ती यांच्यावर नाही. एरवी बाकी कधीच शासनात सहभागी होऊ शकला नसता. तो आता शासनाचा भाग झाला आहे. हे माणसाचं कर्तृत्व आहे, हा माणसाचा पराक्रम आहे... |
|  | ( बाकी हलतो. वळणावळणांच्या रस्त्याने सुहास्यवदनाने सावकाशपणे चालत येतो. वाटेत भेटणाऱ्या माणसांचे नमस्कार एकदा डाव्या आणि एकदा उजव्या हाताने स्वीकारत येतो. नंतर सरकारसमोरच्या खुर्चीवर बसतो. पुढील संवादांत सरकार आणि बाकी यांची चर्चा आहे ; पण बाकी नुसते हातवारे करतो आणि त्याचे संवाद मात्र प्रतीच बोलतो.) |
| सरकारः | आता एकूण हालहवाल काय आहे ? |
| प्रतीः | सगळे विरोध निपटले गेलेले असून त्यातूनही उरलेले आपोआप मोडून पडले आहेत. |
| सरकारः | लोक एकमेकांशी कसे वागताहेत ? |
| प्रतीः | परस्परसामंजस्य आणि प्रेम यांना पूर आलेले आहेत. |
| सरकारः | दुसऱ्या काही अडचणी आहेत ? |
| प्रतीः | आता अडचणी आहेत त्या फक्त अशा : सूर्यास्त पाहून एका माणसाला जितका आनंद होतो तितका दुसऱ्याला होत नाही, त्यामुळं दुसऱ्याला पहिल्याचा हेवा वाटतो. लैंगिकदृष्टया आक्रमक असलेल्या व्यक्तींना जितकं परलिंगी सुख मिळतं तितकं कमी आक्रमकांना मिळत नाही. जवळच्या माणसाच्या मृत्यूनं होणाऱ्या दुःखात अजून काहीच फरक पडलेला नाही. |
| सरकारः | एवढंच ? |
| प्रतीः | या ना त्या प्रकारे स्वतःचं आयुष्य स्वतःसाठी शाबीत आणि शाबूत करून घेण्याची गरज अजूनही लोकांना वाटते. त्यामुळं या ना त्या प्रकारे कुरघोडी करण्याचे आणि अहंकारी आविष्कारांचे प्रकार चालूच आहेत. फक्त पध्दती थोड्याफार बदलल्या आहेत. |
| सरकारः | आणखी ? |
| प्रतीः | लोकांमध्ये आत्मविश्वासाचं प्रमाण कमी-अधिक असल्यानं तुलना आणि भीती यांचं उच्चाटन होऊ शकलेलं नाही. यातून उद्भवणाऱ्या स्पर्धा आणि दुःखं अबाधित आहेत. |
| सरकारः | झालं ? |
| प्रतीः | लोकांच्या मानवी संबंधांमधल्या अपेक्षा अजूनही अर्धवट--अपूर्णच राहताहेत आणि त्यातून निर्माण होणाऱ्या<br>प्रश्नांचे मानसिक ताण अजूनही व्यक्तींना सुखदुःखांचे हेलकावे देताहेत. |
| सरकारः | संपलं ? |
| प्रतीः | मृत्यूची भीती अजूनही गेलेली नाही. |
| सरकारः | आणखी ? |
| प्रतीः | नाही एवढंच. |
| सरकारः | ठीक आहे. यापुढे कुठल्याही गोष्टीचा आनंद वा दुःख वाटून घेण्यास बंदी करून टाकू. या गोष्टी गेल्या की सर्व प्रकारची भीती आपोआप नष्ट होईल असा मला विश्वास आहे. सर्व माणसं निर्भय होण्याचं आपलं स्वप्न सत्यात आणायची वेळ आता आलेली आहे. |
| प्रतीः | वा वा वा वा वा वा वा वा वा वा वा ! बाहत्तर रोगांवरचा एकच जालीम उपाय आपण सांगितलेला असून, सरकार या नात्यानं एवढं झालं की आपलं कर्तव्य पूर्ण होणार आहे. थोडक्यात म्हणजे याला कर्तव्यपूर्तीच म्हणावी लागेल. |
|  | ( बाकी उठतो आणि आल्या रस्त्यानेच आल्या पध्दतीनेच परत जातो. प्रेतपुतळा.) |

प्रतीः ( उच्चरवात )कलावंतांनी आत्महत्या केल्या आहेत. तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक शेतावर गेले आहेत. जाहिराती, सजावट आणि उत्सव इतिहासजमा झालेले आहेत -- आणि सर्व चित्रकार मशिन-ड्रॉईंगचे कोर्सेस घेत आहेत. थोडक्यात म्हणजे, सगळीकडे आबादी आबाद असून मानवी दुःखाच्या मुळाशीच हात घातला गेलेला आहे.

( तुतारी वाजते. बिगुल सुरू होतो. थोडा वेळ वाजत राहतो. मग अस्पष्ट होत जातो आणि पुढील दृश्यात चालूच राहतो.

सरकार आणि प्रती निश्चल. बाकी हलतो. ठराविक अडथळ्यांच्या रस्त्याने येतो. मधेच कुणीतरी पाहून स्मित वगैरे करतो. शर्ट काढून ठेवतो. खणायला सुरुवात करतो. जरा वेळाने पुन्हा शर्ट घालतो. मग आल्या रस्त्याने परत जातो. प्रेतपुतळा. पुन्हा हलतो. वरील सर्व प्रकार पुन्हा करतो. त्याच्या कृती पूर्ण झाल्यावर दोन्ही वेळा सरकार हलतो. आणि सुपरवायझरप्रमाणे चक्कर मारून प्रेतपुतळा बाकीकडे पाहून येतो. आता सारे निश्चल, बिगुल थांबलेला. काही क्षण शांतता. मग सरकार हलतो. नेहमीप्रमाणे चक्कर मारण्यास निघतो. बाकी हलतो. दुःखात खचत असलेला बाकी. सरकार त्याच्याजवळ येतो तोवर बाकी हुंदके देऊ लागलेला. आवाज दाबण्याच्या प्रयत्नात ओक्साबोक्शी गदगदत राहतो. सरकार तटस्थपणे नुसता पाहात उभा. बाकी हळूहळू सावरतो. डोळे पुसतो. शरीरातले दुःखाचे ताण कृत्रिमरीत्या घालवतो. आणि शून्य दृष्टीने पुन्हा प्रेतपुतळा होतो. हे सर्व तटस्थपणे पाहून सरकार परततो.)

प्रतीः ( फक्त चेहऱ्याने ) सर्व दिनक्रम रीतसर सुरू असूनही आज एक रडणारा माणूस दिसला.

( शांतता.)

...आज एक रडणारा माणूस दिसला.

( शांतता.)

आज एक रडणारा माणूस दिसला. ( शांतता. अत्यंत धिमेपणाने आणि हळूहळू आवाज पाडत -- )...आज ...एक ...रडणारा...माणूस...दिसला...

सरकारः ( किंचाळतो) प्रती --ऽऽ

( प्रती सावध.)

प्रती ऽऽ...

( प्रती हळूहळू त्याच्या समोर येतो. ओरडतच --) हे सगळं काय चाललं आहे ? माझ्या आज्ञा भंग केल्या जाताहेत आणि तुम्ही काय झोपा काढताहात ? आज एक माणूस मला रडताना दिसला. ही काय चेष्टा चालवली आहे ? तुम्ही काय कामं करता की हजामती ?

प्रतीः ( शांतपणे ) हजामांच्या श्रमांनाही त्यांची स्वतःची प्रतिष्ठा असल्यानं त्यांचा असा उल्लेख करण्याचं टाळावं सरकार !

सरकारः ( ओरडतच ) फक्त भाषेचे अर्थ घ्या. शब्दार्थ घेत बसू नका. त्या रडणाऱ्या माणसाचा ताबडतोब निकाल लावून टाका. मला हे सहन होणार नाही !

प्रतीः कोणत्याही गोष्टीचा आनंद वा दुःख वाटून घेऊ नये या आपल्या आज्ञेचा आपल्याकडूनच भंग होतो आहे सरकार आणि अशा परिस्थितीत सापडल्यानं आपला संताप झालेला आहे.

सरकारः चालते व्हा !

( डावा हात बोट दाखवण्यासाठी उचललेला. प्रती नुसता त्या डाव्या हाताकडे पाहात राहतो. ते सरकारच्या लक्षात येते. काहीशा ओशाळवाणेपणाने डावा हात खाली घेतो. आणि उजव्या हाताने तीच पोझ घेतो.)

प्रतीः लहानपणी डावखुरी असलेली माणसं मोठेपणी सक्तीनं उजवी झालेली असली तर हे असंच होतं सरकार ! आपण सगळेच डावखुरे आहोत आणि सतत उजवे होण्याच्या प्रयत्नात आहोत --

सरकारः ( उजवा हात जोरकसपणे हिसडून ) चालते व्हा --

प्रतीः ( शांतपणे ) आणि तरीही आम्हाला धोके नको आहेत ... काही गोष्टी अंमलात आणण्यापूर्वी आम्ही एक तर आधी मनोभूमिका तयार करण्याचे प्रयत्न करत राहतो, नाहीतर आधीच त्या गोष्टी अंमलात आणून तशा मनोभूमिकेच्या अभावात पिचत राहतो. आणि आम्हाला मनोभूमिका अपेक्षित आहेत की कार्यक्रमांची अंमलबजावणी, हेच आम्हाला कळेनासं होतं.

सरकारः ( ओरडतो) दोन्हीही ! दोन्हीही -- दोन्हीही अपेक्षित आहेत --

प्रतीः पण आमचं मन आणि कृती कधीच एक नसतात--(वेगळ्या पवित्र्यात -- जोरात--) सरकार, आता आपल्याला विरोध सुरू होण्याच्या क्षणाशी आपण आलेले आहात. कारण आपल्या आज्ञा पाळल्या जाऊ शकण्याच्या मर्यादा आता संपलेल्या आहेत. किंवा आपल्या आज्ञा पाळल्या जाताहेत असं आपल्याला वाटू शकण्याच्या मर्यादा संपलेल्या आहेत. कारण तशा कुठल्याच आज्ञा कधीच पाळल्या जाऊ शकत नाहीत.

सरकारः ( संतापानेच, पण खूप खाली दाबलेल्या आवाजात -- थोडा भीतीचाही अंश --) म्हणजे हे सगळं चुकलं असं तुला म्हणायचंय की काय ?

प्रतीः ' चूक ' आणि ' बरोबर ' याला काहीच अर्थ नाही. आपणच म्हणालात ना की, इतिहास हा फक्त अटळपणे अवतरत जातो म्हणून ? आणि चूक किंवा बरोबर हेच शब्द वापरायचे झाले तर आधीचंही सगळं चूक होतं आणि त्यातून निघालेलंही सगळं चूकच आहे. चुकीचा परिणाम म्हणून निघणाऱ्या गोष्टी बरोबर नसतात. माणसातून जसा माणूसच जन्माला येतो, तशीच चुकीतून फक्त चूकच जन्माला येऊ शकते.

सरकारः म्हणजे संपूर्ण इतिहास ही केवळ एक प्रचंड चूक ?

प्रतीः ' प्रचंड ' हा शब्द आपण आपल्या समाधानासाठी वापरायचा सरकार. मुख्यतः ती एक घाणेरडी चूक आहे.

सरकारः मग हे सगळं चाललंय तरी काय ? कशासाठी ? कुणी ठरवल्यायत या गोष्टी ? चालक कोण याचा ?

प्रतीः खोटऱ्यातून खऱ्याचा विचार होऊ शकत नाही सरकार. खोटऱ्यातून फक्त खोटेच प्रश्न विचारले जाऊ शकतात आणि त्यांना फक्त खोटीच उत्तरं मिळू शकतात.

सरकारः असं असेल तर आत्महत्या हा एकच पर्याय आहे. संपूर्ण मानवजात नष्ट होणं हा एकच मार्ग आहे.

प्रतीः अटळ इतिहासाचा कदाचित तोही शेवट असू शकेल.

सरकारः म्हणजे -- म्हणजे --( अधांतरी एका बिंदूवर दृष्टी स्थिर -- काही क्षण नुसता दगड -- आणि अचानक मोठ्यांदा हसू लागतो -- वेडावाकडा ओरडू लागतो -- शब्द कोणतेच नाहीत -- पण हरतऱ्हेचे असंख्य आवाज -- हसणे आणि ओरडणे -- )

प्रती : ( काही क्षण तटस्थ -- साक्षीभूत -- मग हलतो आणि बाकीला बोलावतो.) बाकी -- बाकी !

( सरकारच्या दंग्यात त्याच्या हाका बाकीला ऐकू जात नाहीत. मग प्रती जोरात किंचाळतो --)

बाकी ऽऽऽऽ --

( बाकी हलतो. घाईघाईने पुढे येतो. सरकार अव्दातव्दा हसत -- ओरडत निघून जातो. पण त्याच्या हसण्या-ओरडण्याचे आवाज लांबून येतच राहतात.) बाकी, सरकार मृत्यू पावलेला आहे. त्याचं देहावसान झालेलं आहे... तो परलोकवासी झालेला आहे...आता नवीन राजवट येणं अपरिहार्य आहे... ती येईल...तत्पूर्वी सरकारला -- आपल्या महान परंपरेप्रमाणे -- श्रध्दांजली वाहणं आवश्यक आहे --- त्याच्यासाठी आपण दोन मिनिटं स्तब्धता पाळू या.

( प्रती आणि बाकी माना खाली घालून प्रेतपुतळे....सरकारच्या हसण्याओरडण्याचे आवाज येतच आहेत...)

...पडदा पडत जातो...



पत्ता -चं.प्र.देशपांडे,
३, स्नेहदीप अपा.
चिंतामणीनगर,
सहकारनगर नं.२, पर्वती,
पुणे - ४११ ००९.

**दूरध्वनी - ४२२ ७८४७.**